राज्यातील प्रतिदिन १२५० मे.टन गाळप क्षमता असलेल्या सहकारी साखर कारखान्यांची गाळप क्षमता प्रतिदिन २५०० मे.टन करण्यासाठी शासकीय भागभांडवल देणे या योजनेंतर्गत नवीन लेखाशीर्षास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ससाका-२०२२/प्र.क.९०/३ स**
मंत्रालय, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ३२
दिनांक : - २१ जून, २०२३

**संदर्भ:**- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक बीजीटी-२०१०/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-२, दिनांक १० ऑगस्ट, २०१०

२) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक: ससाका-२०२२/ प्र.क.९०/३स, दिनांक ९ डिसेंबर, २०२२

३) प्रधान महालेखाकार कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक :ख.वि/चा-१/सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग /यूओआर-२१/२०२३-२४/२९७, दिनांक ९/०६/२०२३

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय क्रमांक:ससाका-२०२२/प्र.क्र.९०/३स, दिनांक ९ डिसेंबर, २०२२ अन्वये राज्यातील प्रतिदिन १२५० मे.टन गाळप क्षमता असलेल्या सहकारी साखर कारखान्यांची गाळप क्षमता प्रतिदिन २५०० मे.टन करण्यासाठी शासकीय भागभांडवल देण्याबाबत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. राज्यातील बहुसंख्य कारखान्यांचे विस्तारीकरण झाले असून, केवळ आर्थिकदृष्टया सक्षम नसल्याने काही १२५० मे.टन प्रतिदिन गाळप क्षमता असलेले कारखाने विस्तारीकरण करू शकलेले नाहीत. १२५० मे.टन प्रतिदिन गाळप क्षमता अतिशय कमी असल्याने अशा कारखान्यांकडून उत्पादित होणारी साखर, मोलॅसिस व इतर उपपदार्थ निर्माण होण्याचे प्रमाण इतर कारखान्यांच्या तुलनेत कमी असते. तसेच, त्यांचा उत्पादन खर्च जास्त आहे. असे कारखाने चालविताना कारखान्याकडील जुनी यंत्रसामग्री, कर्मचाऱ्यांचे अतिरिक्त प्रमाण, अपुऱ्या खेळत्या भांडवलाचा खर्च, घेतलेल्या कर्जापोटी द्यावे लागणारे भरमसाठ व्याज, या व अशा इतर कारणांमुळे १२५० मे.टन प्रतिदिन गाळप क्षमता असलेले कारखाने गेली अनेक वर्ष आर्थिकदृष्टया सक्षम नाहीत. त्यामुळे वरीलप्रमाणे दिनांक ९ डिसेंबर, २०२२ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेल्या निर्णयानुसार संबंधित सहकारी साखर कारखान्यांना भागभांडवल उपलब्ध करुन देण्यासाठी निधीची तरतूद करण्याकरिता खर्चाच्या (भागभांडवल) कर्जावरील व्याजाच्या जमा रकमेसाठी म्हणजेच भागभांडवल वसुलीसाठी लेखाशिर्ष नव्याने निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने विभागाने प्रस्तावित केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने सहमती दर्शविलेल्या नवीन जमा लेखाशिर्षास प्रधान महालेखाकार कार्यालय, मुंबई यांनी संदर्भ क्रमांक ३ मध्ये नमूद दिनांक ९ जून, २०२३ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

"राज्यातील प्रतिदिन १२५० मे.टन गाळप क्षमता असलेल्या सहकारी साखर कारखान्यांची गाळप क्षमता प्रतिदिन २५०० मे.टन करण्यासाठी शासकीय भागभांडवल देण्याबाबत" या योजनेंतर्गत वसुलीच्या जमा रकमेबाबत खालीलप्रमाणे नवीन लेखाशीर्षास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे:-

| इंग्रजी | मराठी |
|---|---|
| Demand No. V-5<br>6425-Loan for cooperation<br>(108)Loans to other co-operatives<br>03 Loans to co-operative sugar mills<br>(03)(12) Share Capital to other Co-op Sugar Factories. (scheme) | मागणी क्र.व्ही-५<br>६४२५-सहकारासाठी कर्ज-<br>१०८-इतर सहकारी संस्थांना कर्ज<br>०३ सहकारी साखर कारखाने (मिल्स)<br>(०३)(१२) इतर सहकारी साखर कारखान्यांना भागभांडवल (कार्यक्रम) |
| (64250734) | (६४२५०७३४) |

२. सदर शासन निर्णय नियोजन विभाग तसेच वित्त विभागाच्या मान्यतेने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २८/२०२३/ऋण व हमी, दिनांक २२/५/२०२३ अन्वये व प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक: ख.वि/चा-१/सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग /यूओआर-२१/२०२३-२४/२९७, दिनांक ९/०६/२०२३अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२११५१३१५०५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUNIL DEORAM AGARKAR

Digitally signed by SUNIL DEORAM AGARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=bd05f4fdbbb9ed343f1be2caf44a80e981a9aaaa980ed10ed0e2772dfcca67cc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=01A0A8594022E4572C9EE1F979883E0867C70D25B214D7205F60D0D0F23484C9, cn=SUNIL DEORAM AGARKAR
Date: 2023.06.21 15:14:54 +05'30'

**(सुनिल आगरकर)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

I. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे प्रधान सचिव.
II. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
III. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
IV. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

V. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
VI. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
VII. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग) मंत्रालय,मुंबई.
VIII. साखर आयुक्त, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
IX. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ) , मुंबई
X. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
XI. लेखा कोषागार अधिकारी, पुणे.
XII. कार्यासन अधिकारी (अर्थ-१३), व्यय-२, ऋण व हमी ,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
XIII. अवर सचिव (१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
XIV. निवड नस्ती ३ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.